माणकुले, सोनकोठा-हाशिवरे खारभूमी योजना, तालुका अलिबाग, जिल्हा रायगड, या योजनेच्या नूतनीकरणास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय, क्रमांकः खाभूयो २०१६/(०६७/२०१६)/खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०६/०६/२०१८

पहावे -

१) शासन निर्णय क्रमांक खाभूयो-२०१२/(२४३/२०१२)/खारभूमी,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : २२ /०६/२०१५

२) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.मुअ/जसंविकोप्र /खारभुमी/माणकुले /रायगड /तां.२ /१३४ दिनांक ११/०१/२०१६

प्रस्तावना:-

माणकुले, सोनकोठा-हाशिवरे खारभूमी योजना तालुका, अलिबाग, जिल्हा रायगड ही खारभूमी योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१(CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. या योजनेची एकूण लांबी ८५७० मीटर आहे. सदर योजना धरमतर खाडीच्या तीरावर आहे. हया योजनेचा बांध कमकुवत असल्याने व उघाडया नादुरुस्त असल्याने शेतक-यांचे नुकसान होत असल्यामुळे ही योजना होणे गरजेचे आहे. त्याकरिता योजना तातडीने हाती घेण्याबाबत ग्राम पंचायत, लाभधारक व लोकप्रतिनिधी यांच्याकडून मागणी करण्यात आल्याने मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये प्राप्त झालेला माणकुले व सोनकोठा-हाशिवरे खारभूमी योजना तालुका, अलिबाग, जिल्हा रायगड या दोन स्वतंत्र प्रकल्पांच्या एकत्रित नूतनीकरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

माणकुले, सोनकोठा-हाशिवरे खारभूमी योजना, ता. अलिबाग, जि. रायगड, या दोनही एकत्रित योजनेस विभागाच्या सन २०११-१२ व सार्वजनिक बांधकाम विभाग दरसूची २०१४-१५ या वर्षाच्या दरसूचीवर आधारित अंदाजित रूपये ९६७.८९/- लक्ष (रुपये नऊशे सदुसष्ठ लक्ष एकोणनव्वद हजार फक्त) एवढया रकमेस याव्दारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामाकरिता रुपये ८७९.९० लक्ष (रुपये आठशे एकोणऐंशी लक्ष नव्वद हजार फक्त) व अनुषंगिक कामाकरिता रुपये ८७.९९ लक्ष (रुपये सत्याऐंशी लक्ष नव्याण्णव हजार फक्त) उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबतच्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद संधारण (०१) खार जमीन योजना (०१) बांधकामे (योजनांतर्गत) (४४०२०३८४)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर कामासाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पित केल्याशिवाय काम सुरु करु नये किंवा निविदा काढू नये तसेच त्यावर खर्च केला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १००/का-१४३४, दिनांक १८.०४.२०१७ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ८५/व्यय-१२, दिनांक १६.०४.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. खारभूमी योजना पूर्ण करण्यासाठी पून:प्रापित क्षेत्रातील लाभधारकांकडून प्रकल्पातील सहभाग म्हणून रुपये ५००/- प्रती हेक्टर खर्च (किमान रुपये २००/- रोख व रुपये ३००/- मजूरीच्या स्वरुपात किंवा रोखीने ) घेण्यात यावे. खारभूमी योजनेचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी लाभधारकांनी सहकारी संस्था स्थापन करावी व योजनेचे काम पूर्ण झाल्यानंतर योजना देखभाल व दुरुस्तीसाठी त्यांच्याकडे हस्तांतरित करण्यात यावी.

६. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता १७४ अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

७. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६०७१५०६२४२२२७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सहपत्र:- परिशिष्ट अ

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.07 15:09:24 +05'30'

( म. ई. धरणे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रतिलिपी :-**

१. मा. मंत्री (खारभूमी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य मुंबई/ नागपूर
४. महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
५. जिल्हाधिकारी, रायगड.
६. मुख्य अभियंता (द. व प्र.) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

७. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
८. आंतर वित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. उपसचिव (लघु पाटबंधारे),जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
११. अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. अवर सचिव, अर्थ शाखा १/२,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. अवर सचिव, वित्त विभाग (अर्थ-२),मंत्रालय, मुंबई
१४. लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई-३२
१५. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ

(शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांकः क्र.खाभूयो २०१६/(०६/२०१६)/खारभूमी, दिनांक ०६.०६.२०१८ चे सहपत्र)

## परिशिष्ट - अ

**माणकुले, सोनकोठा-हाशिवरे खारभूमी योजना ता. अलिबाग जि. रायगड, या योजनेच्या नुतनीकरणास प्रशासकीय मान्यता या अंदाजपत्रकाचा गोषवारा.**

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण किंमत रुपये |
|---|---|---|
| १ | अे-प्राथमिक | ०.०० |
| २ | बी-भूसंपादन | ०.०० |
| ३ | सी- माती काम | ७,२५,८०,३११ |
| ४ | एफ ( आर.एच.टी. वर्क्स ) | १,५३,३६,८१५ |
| ५ | के ( इमारती) | ०.०० |
| ६ | एम-( वृक्षारोपण) | ४८,३५९ |
| ७ | ओ-(संकीर्ण) | २५,००० |
| ८ | पी-(देखभाल) | ०.०० |
| ९ | आर ( दळणवळण) | ०.०० |
| | **एकूण** | **८,७९,९०,४८५** |
| | अनुषंगिक खर्च १० टक्के | ८७,९९,०४९ |
| | **एकूण** | **९,६७,८९,५३४** |

### ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित क्षेत्र | ७९७ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | रुपये १,२१,४४२/- |
| लाभव्यय गुणोत्तर | २.८९ |

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.07 15:09:38 +05'30'

( म. ई. धरणे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन